क्रमांक: उखक १०९५/प्र. क्र. २५/कराधान-३.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-२७ ऑगस्ट १९९६.

विषय:- साखर खरेदीच्या रकमेमधून ऊस खरेदी करावी थकबाकी वसूल करण्याबाबत.

ज्ञापन :-
=====

विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई- ४०० ०१० यांना वरील विषयाच्या संदर्भात असे कळविण्याचा निम्नस्वाक्षांकिताला आदेश आहे की, मा. शिवाजीराव पाटील समितीने आजारी किंवा अति आजारी ठरविलेल्या सहकारी साखर कारखान्यांकडील दिनांक १ एप्रिल १९९५ रोजी प्रलंबित असलेल्या ऊस खरेदीकराच्या थकबाकीच्या मोठ्या/रकमेच्या वसूलीबाबत काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासनाने खालीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेतलेला आहे :-

[१] मा. शिवाजीराव पाटील समितीने आजारी किंवा अति आजारी ठरविल्याप्रमाणे आणि सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविलेल्या सहकारी साखर कारखान्यांकडील ऊस खरेदी कराची प्रलंबित थकबाकी वसूल करण्यासाठी संबंधित साखर कारखान्याने उत्पादित केलेल्या साखरेची खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यांकडून अथवा त्या संदर्भात तारण देणाऱ्या (हायपोथीकेशन) बँकेकडून साखरेच्या १०० किलो वजनाच्या प्रत्येक पोत्यामागे रु. १०/- या दराने ऊस खरेदी करावी थकबाकी वसूल करण्यात यावी.

[२] अशाप्रकारे थकबाकी वसूल करतांना त्यासाठी दि. १ एप्रिल १९९५ रोजी प्रलंबित असलेल्या ऊस खरेदीकराच्या रकमेचाच विचार करण्यात यावा म्हणजेच दिनांक १ एप्रिल १९९५ नंतरच्या कालावधीमधील अथवा चालू हंगामामधील देय असलेल्या ऊस खरेदीकर वसूलीसाठी ही पध्दत वापरण्यात येऊ नये.

[३] अशाप्रकारे साखर खरेदीच्या रकमेतून ऊस खरेदी करावी थकबाकी वसूल करण्याची कार्यवाही विक्रीकर आयुक्तांनी दिनांक १ सप्टेंबर १९९६ पासून करावी.

२. ऊस खरेदीकर थकबाकी प्रलंबित असलेल्या प्रकरणांमध्ये ऊस खरेदीकराच्या थकबाकीचा निश्चित आकडा किती आहे या संदर्भात विक्रीकर विभागाकडील आकडेवारी आणि संबंधित साखर कारखान्याकडील आकडेवारी यामध्ये तफावत असल्यास व त्यामुळे वसूलीचा प्रश्न वादग्रस्त झाला असला तरीसुध्दा अशा कारखान्यांकडून वरील कार्यपध्दतीनुसारच थकबाकीची वसूली चालू ठेवण्यात यावी आणि दरम्यान विभागीय आकडेवारी आणि साखर कारखान्यांकडील आकडेवारी यामधील फरक जुळवीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३. या ज्ञापना सोबतच्या विवरण पत्र "अ" मधील आजारी व अति आजारी सहकारी साखर कारखान्यांकडील ऊस खरेदीकराची थकबाकी शासनाच्या वरील धोरणात्मक निर्णयानुसार साखर विक्रीच्या किंमतीमधून वसूल करतांना ज्या प्रकरणांमध्ये शासनाने कारखान्यांना दिनांक २० जानेवारी १९८४ नंतर स्थगिती अथवा हप्ते सवलत मंजूर केलेली आहे, अशा प्रकरणांमध्ये स्थगितीच्या कालावधी अथवा हप्ते सवलतीचा कालावधी संपुष्टात येईपर्यंत वरील पध्दतीनुसार थकबाकीची वसूली करण्यात येऊ नये. तथापि अशा सर्व प्रकरणांमध्ये संबंधित आजारी अथवा अति आजारी सहकारी साखर कारखान्यांनी त्यांच्या कारखान्यांशी संबंधित विभागीय विक्रीकर उपायुक्तांचे, शासनाने मंजूर केलेल्या स्थगिती अथवा हप्ते सवलतीबाबतचे लेखी प्रमाणपत्र प्रत्यक्ष सादर केल्यानंतरच शासनाने वरील प्रमाणे घेतलेल्या धोरणात्मक निर्णयाप्रमाणे त्या सहकारी साखर कारखान्याकडील ऊस खरेदीकराच्या थकबाकीची वसूली साखर विक्रीच्या रकमेमधून करण्यात येऊ नये.

४. अशाप्रकारे शासनाने घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार थकबाकीदार साखर कारखान्यांकडील ऊस खरेदी कराच्या थकबाकीची वसूली त्यांच्या साखर विक्रीच्या रकमेमधून करण्यात यावी व त्यासंबंधीचा अहवाल शासनाला दर १५ दिवसांनी पाठविण्यात यावा तसेच या संदर्भात शासनाच्या

साखर आयुक्तांशी संपर्क साधून वसुलीच्या संदर्भात त्यांचे आवश्यक ते सर्व सहकार्य उपलब्ध करून घ्यावे व त्यांना मुद्दा थकबाकी वसुलीबाबत पूर्वकल्पना देण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ दि. श्री. दीक्षित ]
विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित.

१] सचिव, सहकार व वस्त्रोद्योग [सहकार], मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२] साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३] अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, साखर भवन, नरिमन पॉईंट, मुंबई,

४] व्यवस्थापकीय संचालक, दि. महाराष्ट्र स्टेट को. ऑप. बँक मर्यादित, सर विठ्ठलदास ठाकरसी मेमोरीयल बिल्डींग, ९, महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स लेन, फोर्ट, मुंबई-४०००२३.

५] निवड नस्ती, केराधान-३.

## विवरणपत्र "अ"

राज्य शासनाने सहकार व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक ससाका ३९९०/३५०६६/सीआर-३२०/३-सी, दि. २१ नोव्हेंबर १९९० अन्वये नियुक्त केलेल्या शिवाजीराव पाटील समितीने ठरविलेल्या आजारी आणि अति आजारी साखर कारखान्यांची यादी.

### आजारी कारखाने [ एकूण १५ ]

| अ.क्र. | कारखान्याचे नांव |
|---|---|
| १. | जय जवान जय किसान सहकारी साखर कारखाना लि. लातूर |
| २. | कादवा सहकारी साखर कारखाना लि. जि. नाशिक |
| ३. | अशोक सहकारी साखर कारखाना लि. जि. अहमदनगर |
| ४. | शेतकरी सहकारी साखर कारखाना, किल्लारी, जि. लातूर |
| ५. | कडा सहकारी साखर कारखाना, जि. जि. बीड |
| ६. | भीमा सहकारी साखर कारखाना, लि. टाकळी सिकंदर, जि. सोलापूर |
| ७. | पांझरा कान सहकारी साखर कारखाना, लि. जि. धुळे |
| ८. | गिरणा सहकारी साखर कारखाना, जि. जि. नाशिक |
| ९. | श्रीराम सहकारी साखर कारखाना, लि. जि. नागपूर |
| १०. | वैनगंगा सहकारी साखर कारखाना, जि. जि. भंडारा |
| ११. | विश्वास सहकारी साखर कारखाना लि. सांगली |
| १२. | संत एकनाथ सहकारी साखर कारखाना लि. पैठण औरंगाबाद. |
| १३. | गंगापूर सहकारी साखर कारखाना लि. जि. औरंगाबाद |
| १४. | विनायक सहकारी साखर कारखाना लि. ता. वैजापूर, जि. औरंगाबाद |
| १५. | कन्नड सहकारी साखर कारखाना लि. जि. औरंगाबाद. |

### अति आजारी साखर कारखाने [ एकूण १३ ]

| | |
|---|---|
| १. | नाशिक सहकारी साखर कारखाना, जि. पळसे, जि. नाशिक |
| २. | पारनेर सहकारी साखर कारखाना लि. पारनेर, जि. अहमदनगर |
| ३. | भोगावती सहकारी साखर कारखाना लि. ता. इर्ले, वैराग, जि. सोलापूर |
| ४. | संजय सहकारी साखर कारखाना लि. जि. धुळे |

कृ.मा.प.

५. जिजामाता सहकारी साखर कारखाना लि. जि. बुलढाणा

६. मराठवाडा सहकारी साखर कारखाना लि. जि. परभणी

७. गोदावरी सहकारी साखर कारखाना लि. [दुधना], जि. परभणी

८. कळंबर सहकारी साखर कारखाना लि. जि. परभणी

९. शेतकरी [धामणगांव] सहकारी साखर कारखाना लि. अमरावती

१०. गणेश सहकारी साखर कारखाना लि. जि. अहमदनगर

११. वृध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि. जि. अहमदनगर

१२. जगदंबा सहकारी साखर कारखाना लि. जि. अहमदनगर

१३. वसंत सहकारी साखर कारखाना लि. जि. जळगांव [कासोदा]